आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती, पंडीत दिनदयाल उपाध्याय स्वयं योजना व मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतिगृह या योजनांकरिता निधी वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष २२२५ २२८२, २२२५ डी ९४१, २२२५ ई ०२४ व २२२५ डी ७२५)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२/ कार्यासन ६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २९ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि. ०४.०३.२०२४

२) आदिवासी विकास विभाग पुनर्विनियोजन ज्ञापन क्र. पुनर्वि-२०२४/प्र.क्र.५४/कार्या-६, दि. २९ मार्च, २०२४.

३) आदिवासी विकास विभाग,नस्ती क्र. पुनर्वि-२०२४/प्र.क्र.५४/कार्यासन-६

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती, पंडीत दिनदयाल उपाध्याय स्वयं योजना व मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतिगृह या योजनांकरिता शिल्लक असलेला व वाढीव निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीद्वारा वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-०५ मधील २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून केंद्र पुरस्कृत योजना-भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (केंद्र हिस्सा ७५ टक्के), भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (राज्य हिस्सा ७५ टक्के), पंडीत दिनदयाल उपाध्याय स्वयं योजना व मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतिगृह या योजनांकरिता संदर्भाधीन क्र. ०२ येथील पुनर्विनियोजन ज्ञापनान्वये उपलब्ध झालेला खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | योजनेचे नाव | बाब क्रमांक | सन २०२३-२४ साठी मंजूर सुधारीत अंदाज | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली एकूण तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | |
| १ | केंद्र पुरस्कृत योजना-भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (केंद्र हिस्सा ७५ टक्के) (२२२५ २२८२) | ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने) | ४५०००.०० | १२०३६.०० |
| २ | भारत सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (राज्य हिस्सा ७५ टक्के) (२२२५ डी ९४१) | ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने | १५०००.०० | ४०१२.०० |
| ३ | पंडीत दिनदयाल उपाध्याय स्वयं योजना (२२२५ ई ०२४) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ८४००.०० | ६१५३.०० |
| ४ | मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतिगृह (२२२५ डी ७२५) | ५०, इतर खर्च | ३१५०.०० | १०५३.०० |
| | **एकूण :-** | | **७१५५०.००** | **२३२५४.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु. २३२.५४ लाख (अक्षरी रुपये दोनशे बत्तीस कोटी चौपन्न लाख फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. ३९४/२०२४/व्यय-१४, दि. २८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मंजुरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१८२२४७६३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.29 13:00:24 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आदिवासी विकाय आयुक्तालय, नाशिक
४) उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती, कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग.